**Interpretation Centre at Eco-Park पोंभुर्णा येथील बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. निसप्र-२०१७/प्र.क्र.४४/फ-५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २९ मार्च, २०१७

वाचा - १. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष -२४(३)/व अ/११६५/२०१६-१७, दि. ०८/०३/२०१७

**प्रस्तावना** -

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी दि. ०८/०३/२०१७ च्या पत्रान्वये मध्य चांदा वन विभागातील कोठारी वनपरिक्षेत्रातील Interpretation Centre at Eco-Park पोंभुर्णा येथील बांधकामाच्या रु.४८.१६९ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

सदरहू बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर वनवृत्तातील मध्य चांदा वन विभागातील कोठारी वनपरिक्षेत्रातील Interpretation Centre at Eco-Park पोंभुर्णा येथील बांधकामास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे एकुण रु.५९.६४ लक्ष **(एकोणसाठ लाख चौसष्ठ हजार फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| अ.क्र | कामाचा तपशिल | शासनमान्य अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | Construction of Interpretation Center at Eco-Park Pombhurna in Kothari Range of Central Chanda Division. | ५९.६४ |
| | **एकूण** | **५९.६४** |

सदरहू प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) पुढील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

१) बांधकाम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करायचे झाल्यास त्यात ५ % सेंटेज चार्जेसची तरतुद मिळवण्यात यावी.

२) सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. बीडीजी२०१४/प्र.क्र९६/इमा-३, दि. ८.७.२०१४ मधील कार्यपद्धतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी. त्याचबरोबर अंदाजपत्रकावर सक्षम अधिका-याची स्वाक्षरी घेण्यात यावी. अंदाजपत्रकासोबत जोडण्यात आलेले नकाशे खाजगी वास्तुशास्त्रज्ञाकडून तयार करुन घेण्यात आलेले आहेत या नकाशास शासकीय वास्तुशास्त्रज्ञ यांची मंजूरी घेण्यात यावी व अंदाजपत्रकामध्ये दरसुचीचा उल्लेख करण्यात यावा.

४) अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाच्या कार्यकारी अभियंता यांचेकडून साक्षांकीत करुन घेण्यात यावीत.

५) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक व दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१ दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) कामासाठी वनसंवर्धन अधिनियम १९८० अंतर्गत आवश्यक असलेली परवानगी घ्यावी.

८) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दि. १५ मे २००९ , वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२९१३०४०६९६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d44360342632 9c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.03.29 13:06:34 +05'30'

**(अनिल धस)**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर.
४. मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) चंद्रपूर.
५. उप वनसंरक्षक, मध्य चांदा वनविभाग, चंद्रपूर.
६. महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.

८. कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई-३२.

१०.ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

११.कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ (निवड नस्ती).